स्थानिक स्वराज्य संस्था (महानगरपालिका/ नगरपरिषद/जिल्हा परिषद) यांनी उच्च माध्यमिक शाळा सुरु करण्यासंदर्भात....

जिल्हा परिषद, बुलढाणा अंतर्गत जिल्हा परिषद मराठी उच्च प्राथमिक शाळा भिंगारा या शाळेस इ. ९ वी ते १० वी चे वर्ग जोडणे बाबत....

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रिडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः एसएफएस-१०२२/प्र.क्र.३२१/एसएम- २
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०९ जून, २०२३

वाचा -

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: नमाशा-२००९/(४९७/०९)/ माशि-१, दिनांक ११ जून, २००९.

२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे यांचे पत्र क्र. शिसं/ माध्य/ स्वयंअर्थ/२०२१-२२/ एस-४/२/२२, दि. ०१/०४/२०२२.

प्रस्तावना :-

जिल्हा परिषद, बुलढाणा अंतर्गत जिल्हा परिषद, मराठी उच्च प्राथमिक शाळा, भिंगारा या शाळेस इ. ९ वी ते १० वी चे वर्ग जोडण्यास परवानगी मिळणेबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. (२) अन्वये शासनास प्राप्त झाला होता. उपरोक्त प्राथमिक ते उच्च प्राथमिक शाळेस जोडुन माध्यमिक वर्ग सुरु करण्यास दर्जावाढ परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

१. महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ (सन २०१३ चा ०१) अंतर्गत जिल्हा परिषद, बुलढाणा यांचे परिक्षेत्रातील खालील नमुद प्राथमिक ते उच्च प्राथमिक शाळेस जोडुन माध्यमिक वर्गाला दर्जावाढ करण्यास सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन स्तरावरुन परवानगी देण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | शाळेचे नाव | माध्यम | शाळेचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा परिषद, बुलढाणा अंतर्गत जिल्हा परिषद, मराठी उच्च प्राथमिक शाळा, भिंगारा, ता. जळगाव जामोद. | मराठी | प्राथमिक ते उच्च प्राथमिक शाळेस जोडुन माध्यमिक शाळा, (इ. ९ वी ते इ. १० वी) |

**अटी व शर्ती :-**

I. सदर प्राथमिक ते उच्च प्राथमिक शाळेस जोडुन माध्यमिक दर्जावाढ करण्याकरीता आवश्यक शिक्षक-शिक्षकेत्तर कर्मचारी यांवरील खर्च व शाळा इमारत बांधकामावरील खर्च समग्र शिक्षा अभियानांतर्गत करण्यात यावा. याव्यतिरीक्त व यापुढे येणाऱ्या कोणत्याही खर्चाकरिता, राज्य शासनाकडून प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष असे कोणतेही वित्तीय सहाय्य / अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

II. माध्यमिक शाळांबाबतचे शासनाचे प्रचलित धोरण व निकष यांचे पालन करणे तसेच शाळेमध्ये आवश्यक वर्गखोल्या, सर्व भौतिक व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देणे अनिवार्य राहील.

III. महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ अन्वये निर्धारित केलेल्या सर्व मानकांचे, अटींचे व शर्तींचे आणि या अधिनियमांन्वये शासनाने दिलेल्या निदेशांचे किंवा शासनाने वेळोवेळी विनिर्दिष्ट केलेल्या मानकांचे किंवा अटीं व शर्तींचे पालन करणे अनिवार्य राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०६०९१७१३४७३०२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRADIP SURESH PADOLE

Digitally signed by PRADIP SURESH PADOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=481cbce0eb79e3ee398d9eda25f5efbce98773459b0760f9d553dbce4472de1c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA7528175505A3220AA60D43BC262BA09B055BA986E0E817D7150AA2D85AFEEE, cn=PRADIP SURESH PADOLE
Date: 2023.06.09 17:15:46 +05'30'

**( प्रदिप पडोळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा.
६. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद, बुलढाणा.
७. निवडनस्ती (३२१/२०२२/एसएम २).